**राज्यातील इंदिरा आवास योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी “राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना” गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : २०१५/प्र.क्र.२४०/योजना-१०**

२५, मर्झबान रोड, बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक : १६ जुलै, २०१५.

**<u>प्रस्तावना:.</u>**

राज्य शासनाने ग्रामीण गृहनिर्माणला विशेष महत्व दिले आहे. दरवर्षी राज्यात इंदिरा आवास योजने अंतर्गत रु.१००० कोटीच्या वर निधी खर्च करण्यात येतो. तसेच दरवर्षी साधारणत: एक लाखाच्यावर घरकुले बांधण्यात येतात.

सन २०१३-१४ पर्यंत केंद्र शासनाकडून मिळणारा निधी थेट जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना उपलब्ध करुन दिला जात होता. तथापि, केंद्र शासनाच्या निर्देशानुसार सन २०१४-१५ पासून सदरचा निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा केला जातो व अर्थसंकल्पातील तरतुदीनुसार जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत करण्याची कार्यवाही मंत्रालय स्तरावरून करावी लागते. त्यामुळे केंद्रीय निधी अर्थसंकल्पित करणे व वितरीत करण्यासाठी समन्वय करणे, वित्त विभागाकडून BDS वर रक्कमा काढून वितरीत करणे इत्यादी अतिरिक्त कामे मंत्रालय स्तरावर ग्राम विकास विभागाकडे आलेली आहेत.

अलिकडेच केंद्र शासनाने सन २०२२ पर्यंत “सर्वांसाठी घर” हे धोरण जाहिर केले आहे. त्यानुसार, नागरी क्षेत्राकरिता दोन कोटी घरे व ग्रामीण भागाकरिता चार कोटी घरे या कालावधीत बांधून द्यावयाची आहेत. महाराष्ट्र राज्य हे क्षेत्र आणि लोकसंख्या या दृष्टीकोनातून मोठे राज्य असल्यामुळे येत्या काही वर्षात राज्याला घर बांधण्यासाठी मोठया प्रमाणात अतिरिक्त उद्दीष्ट दिले जाण्याची शक्यता आहे.

सन २०१५-१६ पासून केंद्र शासनाने इंदिरा आवास योजने अंतर्गत EFMS-PFMS प्रणाली अंमलात आणण्याचे निदेश दिले आहेत. इंदिरा आवास योजनेच्या लाभार्थ्यांना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा किंवा गट विकास अधिकारी यांच्या मार्फत निधी उपलब्ध करून देण्याची पूर्वीची कार्यपध्दती आता अस्तित्वात राहणार नसून त्याऐवजी योजनेच्या लाभार्थांना निधी थेट उपलब्ध होणार आहे.

राज्यस्तरावर ग्राम विकास विभागांतर्गत कोणतेही संचालनालय किंवा आयुक्तालय नसल्यामुळे अन्य मंत्रालयीन विभाग तसेच ३४ जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व अन्य क्षेत्रीय कार्यालये यांच्याशी यासंदर्भात समन्वय ठेवणे अशा स्वरूपाची कामे मंत्रालय स्तरावरुन केली जातात. सद्य:स्थितीत या व्यापक कार्यक्रमाच्या प्रभावी अमलबजावणीसाठी मंत्रालय स्तरावर धोरण निश्चित करणे, योजनेचे समन्वय व संनियंत्रण करणे यासाठीची व्यवस्था अपुरी पडत आहे.

इंदिरा आवास योजनेसंदर्भात ३४ जिल्हयांशी समन्वय साधण्यासाठी व प्रभावीपणे संनियंत्रण करण्यासाठी स्वतंत्र व्यवस्थापन कक्ष असल्यास ग्रामीण गृहनिर्माण कार्यक्रमाची वेगाने व

प्रभावीपणे अंमलबजावणी करता येऊ शकेल. यास्तव स्वतंत्र "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" स्थापन करण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर विचारांती शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेताला आहे-

(१) **इंदिरा आवास योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" (State Management Unit-Indira Awaas Yojana) स्थापन करणे.**

(२) "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" हा कक्ष राज्याच्या चौतीस जिल्हयांत कार्यक्रमाची अंमलबजावणी करणे, इतर विभागांच्या उदा.सामाजिक न्याय, आदिवासी, गृहनिर्माण विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयाशी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत समन्वय ठेवणे व केंद्र शासनाशी अंमलबजावणी संदर्भातील विषयांबाबत समन्वय करेल.

(३) सदर कक्ष बँका व इतर वित्तीय संस्थांशी समन्वय करुन कर्ज तसेच इतर योजनांतर्गत असलेले अनुदान उपलब्ध करुन देण्याकरिता समन्वय करेल.

(४) "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" हा कक्ष इंदिरा आवास योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी व कक्षाच्या उपयोगीतेशी निगडीत आहे. यासाठी ३ वर्षानंतर सदर कक्षाच्या आवश्यकतेबाबत आढावा घेण्यात येईल. त्यामुळे कक्षाची सदरची व्यवस्था ही स्थायी स्वरुपाची नसेल.

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजनेचे कार्यान्वयन**

"राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" - चे कार्यालय मुंबई महानगर क्षेत्रातील मुंबई,नवी मुंबई किंवा ठाणे या ठिकाणी जागेच्या उपलब्धतेनुसार व इतर बाबी विचारात घेऊन असेल.

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना कक्षाच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या**

राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना चे कर्तव्य व जबाबदाऱ्या याबाबतचे विवरण परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे आहे.

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना करिता पदे**

राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना करिता खालील दोन प्रकारची पदे उपलब्ध करुन देण्यात येत आहेत :-

अ) **ग्राम विकास विभागाच्या आस्थापनेवरील कालबाह्य झालेली पदे रूपांतरीत करून वापरावयाची पदे-**

वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/ प्र.क्र.४१/अर्थ-१ दिनांक २ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीअन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार ग्राम विकास विभागाच्या आस्थापनेवरील एकात्मिक ग्राम विकास प्रकल्प कक्षा करिता निर्माण करण्यात आलेली काही समकक्ष पदे कालबाह्य झाल्यामुळे रूपांतरीत करुन परिशिष्ट- "ब" मधील पदे सदर कक्षास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**ब) इंदिरा आवास योजने अंतर्गत प्रशासकीय खर्चासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून निर्माण करण्यात आलेली पदे-**

केंद्र शासनाने इंदिरा आवास योजनेच्या एकूण निधीच्या ४% निधी हा प्रशासकीय खर्चासाठी स्वतंत्रपणे उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी हा इंदिरा आवास योजनेच्या मार्गदर्शक

सूचनांमधील परि.३.६ मधील निर्देशानुसार इंदिरा आवास योजनेच्या प्रभावी नियंत्रण व अंमलबजावणीसाठी उपलब्ध होणार आहे.

**वरील (ब) प्रमाणे पदे निर्माण करण्याचा निर्णय स्वतंत्रपणे घेण्यात येईल.**

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना ची संरचना**

"राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" ची संरचना परिशिष्ट-क मध्ये दर्शविल्याप्रमाणे असेल.

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना च्या कार्यालयाचा खर्च**

वाहन प्रवास, कार्यालयाच्या जागेचे भाडे, दुरध्वनी, स्टेशनरी इत्यादी इंदिरा आवास योजनेसाठी उपलब्ध असलेल्या ४% प्रशासकीय खर्चातून करण्यात येईल.

**सोसायटीची स्थापना**

राज्यात राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व राष्ट्रीय ग्रामीण जीवननौती अभियानाच्या धर्तीवर इंदिरा आवास योजनेअंतर्गत केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त होणा-या निधीचे व्यवस्थापन व संनियंत्रण करण्यासाठी सोसायटीज् रजिस्ट्रेशन ॲक्ट, १८६० अंतर्गत संस्था तयार करण्याचे निर्देश केंद्र शासनाच्या D.O.No.J-१२०११/०१/२०११-RH, दिनांक २१ जून,२०१२ च्या पत्रान्वये दिल्या आहेत. राज्यातील ग्रामीण घरकुल कार्यक्रमाची अंमलबजावणी करणे, या कार्याक्रमांचे समन्वयन व नियंत्रण करणे तसेच या कार्यक्रमांतर्गत निधीचे व्यवस्थापन व संनियंत्रण करण्यासाठी विहीत कालावधीत सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट,१८६० खाली स्वतंत्र कक्ष निर्माण करण्यात येईल. याबाबतच्या प्रस्तावास योग्य पातळीवर मान्यता घेऊन अंतिम निर्णय घेण्यात येईल. त्यानंतर यासंदर्भात सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येतील.

**बँक खाते उघडणे**

केंद्र शासनाच्या इंदिरा आवास योजनेंतर्गत नवीन निधी वितरण प्रणाली नुसार केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त होणारा निधी "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" या कक्षाच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात येईल व त्यानंतर या योजनेंतर्गत गटस्तरावरून प्राप्त झालेल्या योजनेच्या लाभार्थ्यांच्या यादीनुसार लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात अनुदान थेट जमा करण्यात येईल. सदरचे बँक खाते उघडण्यास वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०९/२०१४/कोषा प्र ५, दि.१३.११.२०१४ अन्वये मान्यता दिलेली आहे.

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना -**

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना, संचालक,** राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना (State Management Unit-Indira Awaas Yojana) यांच्या नियंत्रणाखाली काम करेल. "राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना" च्या संनियंत्रणासाठी दोन समितीची स्थापना करण्यात येत आहे.

(अ)कामकाज आढावा समिती (Performance Review Committee)

मा.मंत्री (ग्राम विकास) हे या समितीचे अध्यक्ष तर मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) हे उपाध्यक्ष असतील. या समितीच्या वर्षातून किमान दोन बैठका होणे अपेक्षित असून होणाऱ्या प्रत्येक बैठकीमध्ये इंदिरा आवास योजनेच्या प्रगतीचा आढावा घेण्यात येईल व योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी योग्य ते मार्गदर्शन / सूचना समितीमार्फत देण्यात येतील.

**(ब)कार्यकारी समिती (Executive Committee)**

राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजनेच्या अंमलबजावणी व कार्यवाही संबंधीचे सर्व निर्णय या समितीमार्फत घेण्यात येणार असून समितीच्या अध्यक्षस्थानी प्रधान सचिव / सचिव (ग्राम विकास) हे असतील. या समितीकडे राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना संबंधीच्या सर्व कार्यप्रणालीचे अंतिम अधिकार असतील. या समितीची दोन महिन्यातून एकदा किंवा आवश्यकता असेल तेव्हा बैठका आयोजित केली जाईल.

**कामकाज आढावा समिती व कार्यकारी समितीची रचना जोडपत्र-ड मध्ये दर्शविण्यात आली आहे.**

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०९/२०१४/कोषा प्र ५ दि.१३.११.२०१४ अन्वये व शासन निर्णय वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२ जून, २०१५ अन्वये विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१६१३३५२५८५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V Giriraj

Digitally signed by V Giriraj
DN: c=IN, o=All India Service, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=V Giriraj
Date: 2015.07.16 13:40:55 +05'30'

( वि.गिरीराज )
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक
४) मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक
५) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
६) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव, नियोजन/वित्त/सामाजिक न्याय/ आदिवासी विकास/ गृहनिर्माण विभाग
७) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच प्रतींसह)
८) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर (पाच प्रतींसह)
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा
१३) सर्व उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय
१४) सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा

१५) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.

१६) अप्पर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मीक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष,

१७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

१८) निवड नस्ती.

## परिशिष्ट-अ

**राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना कक्षाच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या**

**सर्वसाधारण -**

- केंद्र शासनास राज्याचे उद्दिष्ट कळविणे, सदर उद्दिष्ट जिल्हयांना वाटप करणे, केंद्र शासनाकडे निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे, केंद्र व राज्य शासनास निधी उपलब्धतेबाबत प्रस्ताव सादर करणे, लेखा परिक्षण अहवाल व इतर अनुषंगिक बाबीं संदर्भात कार्यवाही करण्याची जबाबदारी "राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना" यांची राहील.
- राज्याच्या इतर प्रशासकीय विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या शबरी आवास योजना, रमाई आवास योजनांचा निधी सद्यस्थितीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, गट विकास अधिकारी यांचेमार्फत वितरीत करण्यात येतो. संबंधित प्रशासकीय विभागाच्या मान्यतेनंतर सदर योजनांचा निधी देखील राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवस योजना मार्फत लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात निधी थेट जमा करण्यासाठी EFMS/ PFMS प्रणालीचा उपयोग करेल.
- इंदिरा आवास योजनेसंबंधात शासन स्तरावर घेण्यात आलेले धोरणात्मक निर्णयाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे व समन्वय साधणे.
- इंदिरा आवास योजनेचे संनियंत्रण करणे व अहवाल शासनास सादर करणे.
- इंदिरा आवास योजनेचे वार्षिक उद्दिष्ट, लाभार्थ्यांची निवड, लाभार्थ्यांना प्राथम्यक्रम ठरविणे इत्यादीबाबत नियोजन करण्यासाठी शासनास सहकार्य करणे.
- केंद्र व राज्य शासनाचे विभाग, विविध बँका व अन्य वित्तीय संस्था यांच्याशी समन्वय साधणे.

**वित्त व लेखा**

- राज्य शासनाकडील निधी जिल्हा, तालुका व लाभार्थ्यांना PFMS प्रणालीमार्फत वितरीत करणे.
- निधी व्यवस्थापन
- उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त करुन घेणे
- वितरीत निधीचे लेखा परिक्षण
- महालेखापाल कार्यालयाकडील लेखा परिक्षा, स्थानिक निधीचे लेखापरिक्षण इत्यादीची उत्तरे तयार करण्याकरिता व अन्य संबंधित कार्यामध्ये राज्य शासनास सहाय्य करणे.

**बँकींग आणि इतर वित्तीय संस्थांशी संपर्क-**

- बँक, हूडको, एल.आय.सी. व अन्य वित्तीय सस्थांकडून इंदिरा आवास योजनेच्या अर्थसहाय्या व्यतिरिक्त अतिरिक्त निधी मिळण्यासाठी आवश्यक प्रयत्न करणे. (इंदिरा आवास योजनेच्या मार्गदर्शक सूचनेमधील परिच्छेद-६.९ (ii))
- या क्षेत्रात प्रगती करण्याच्या दृष्टिने कुशल व तज्ञ व्यक्तींचा सहभाग.

**तांत्रिक सहाय्य व क्षमता बांधणी**

- चांगल्या दर्जाच्या घरांच्या बांधकामासाठी लाभार्थी, गट विकास अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा आणि इतरांना तांत्रिक सहाय्य करणे.
- लाभार्थी, अभियंता, गट विकास अधिकारी व इतरांना प्रशिक्षण.
- नवीन बांधकाम साहित्य व किफायतशिर बांधकाम तंत्राची ओळख.
- वास्तुरचनाकार (आर्किटेक्ट) व डिझायनर यांचे सहकार्य घेणे

**अहवाल संनियंत्रण**

- कामाचा दर्जा उंचावण्याच्या दृष्टीने मूल्यमापन अभ्यास व अन्य assessments आयोजित करणे.
- वेळोवेळी अहवाल प्राप्त करुन ते राज्य व केंद्र शासनास सादर करणे.
- परिणामकारक संनियंत्रणाकरिता Awaassoft MIS व अन्य प्रणालींचा वापर करणे.

**प्रसिध्दी व जनजागृती**

- प्रसिध्दी माध्यमांद्वारे जनजागृती
- क्षेत्रिय अधिकाऱ्यांसाठी तांत्रिक व मार्गदर्शक साहित्याची छपाई.

## परिशिष्ट- ब

(अ) ग्राम विकास विभागातील सध्याची पदे रुपांतरित करुन निर्माण करण्यात आलेली पदे :-
(वाचा-शासन निर्णय, वित्त विभाक क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.२.६.२०१५)

| पदाचे नांव | वेतनश्रेणी | पदाची उपलब्धता |
|---|---|---|
| (१) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- इंदिरा आवास योजना | रू.१५६००-३९१०० ग्रेड पे रू.७६००/- | अतिरिक्त संचालक (सांख्यिकी), (एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम) या उपलब्ध पदाचे महाराष्ट्र विकास सेवेतील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी दर्जाच्या पदात रुपांतरीत करुन. |
| २) उप संचालक राज्य व्यवस्थापन कक्ष- इंदिरा आवास योजना | रू.१५६००-३९१०० ग्रेड पे रू.५४०० | उप संचालक (सांख्यिकी) (एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम) या उपलब्ध पदाचे महाराष्ट्र विकास सेवेतील उप मुख्य कार्यकारी अधिकारी दर्जाच्या पदात रुपांतरीत करुन |
| ३) सहाय्यक संचालक (लेखा) | रू.१५६००-३९१०० ग्रेड पे रू.५४०० | उप संचालक (सांख्यिकी) (एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम) या उपलब्ध पदाचे महाराष्ट्र विकास सेवेतील सहायक संचालक (लेखा) दर्जाच्या पदात रुपांतरीत करुन |
| ४) संशोधन अधिकारी | रू.९३००-३४८०० ग्रेड पे रू.४४०० | संशोधन अधिकारी (सांख्यिकी) (एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम) हे उपलब्ध पद राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना कडे स्थलांतरीत करुन |
| ५) संशोधन सहाय्यक | रू.९३००-३४८०० ग्रेड पे रू.४३०० | संशोधन सहायक (एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम) हे उपलब्ध पद राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना कडे स्थलांतरीत करुन |

(ब) याव्यिरिक्त, या कक्षाच्या कार्यालयाच्या बळकटीकरणाच्या दृष्टीने **सुयोग्य पातळीवर मान्यता घेउन** काही विशिष्ट पदे निर्माण करण्यात येणार आहेत. या संवर्गातील पदांकरिता इंदिरा आवास योजना किंवा अन्य राज्यस्तरीय योजनांतर्गत प्रशासकीय अनुदानांतून निधी उपलब्ध करण्यात येईल. यापैकी काही पदे प्रतिनियुक्तीने व काही पदे करार पध्दतीने भरण्यात येतील. पदाबाबतची संपूर्ण माहिती योग्य त्या निर्णयानंतर जाहीर करण्यात येईल.

राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना_ करिता निर्माण करण्यात येणारी सर्व पदे ही योजनेशी संलग्न आहेत. ही पदे कायमस्वरुपी नसून आवश्यकतेनुसार पदांचा आढावा घेण्यात येईल व ती रूपांतरीत /कमी करता येतील.

## परिशिष्ट-क

## राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिराआवास योजनेची रचना

सदर व्यवस्थापन कक्षाचा प्रमूख हा अतिरिक्त मुख्य कार्यकारी दर्जाचा राज्य संचालक असेल. त्यांच्या खालोखाल उप मुख्य कार्यकारी अधिकारी दर्जाचा सह राज्य संचालक असेल.

राज्य संचालक हे राज्यामध्ये करावयाच्या योजनेच्या अंमलबजावणी संदर्भात कार्यालयाला निदेश देतील.

कार्यालयामध्ये तांत्रिक, वित्त व लेखा, संनियंत्रण व मुल्यमापन, बँकींग आणि पत, प्रसिध्दी व जन जागृती निर्मिती (जन जागरण) याकरिता स्वतंत्र विभाग कार्यरत असतील.

## परिशिष्ट-ड

राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना हा कक्ष खालील दोन समित्यांच्या मार्गदर्शनानुसार व निदेशानुसार कार्ये पार पाडील.

### (अ) कार्यक्रम आढावा / पुनर्विलोकन समिती

| | |
|---|---|
| मा.मंत्री, ग्राम विकास | अध्यक्ष |
| मा.राज्यमंत्री, ग्राम विकास | उपाध्यक्ष |
| सचिव, ग्राम विकास | सदस्य |
| सचिव , रोहयो | सदस्य |
| सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| सचिव,सामाजिक न्याय विभाग | सदस्य |
| सचिव, गृहनिर्माण | सदस्य |
| राज्य संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- इंदिरा आवास योजना कक्ष | सदस्य सचिव |

सदर समिती वर्षातून दोनदा कक्षाच्या कार्याचे पुनर्विलोकन करेल व धोरणात्मक बाबीच्या अनुषंगाने सल्ला व निर्देश देईल.

### (ब) कार्यकारी समिती.

| | |
|---|---|
| सचिव, ग्राम विकास | अध्यक्ष |
| सचिव, गृहनिर्माण | सदस्य |
| सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| सचिव,सामाजिक न्याय विभाग | सदस्य |
| उप सचिव - ग्राम विकास विभाग इंदिरा आवास योजना | सदस्य |
| राज्य संचालक- राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान | सदस्य |
| राज्य संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- इंदिरा आवास योजना कक्ष | सदस्य सचिव |

कक्षाच्या कामकाजासंदर्भात सर्व निर्णय घ्यावयाच्या शक्ती कार्यकारी समितीला देण्यात येत आहेत. तथापि, विशेष निदेशाद्वारे दैनंदिन कामकाजाच्या संदर्भात, राज्य व्यवस्थापन कक्ष (इंदिरा आवास योजना) यांना प्राधिकृत करण्यात येईल.

*-*-*-*-*-*